**शिधापत्रिका वितरणातील अनियमितता व त्रूटीस जबाबदार असणाऱ्या तसेच गैरव्यवहार करणाऱ्या अधिकारी / कर्मचारी यांच्यावर कारवाई करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन शुद्धीपत्रक क्र: शिवाप -२०१९/प्र.क्र.३८/नापु २८**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ०९ नोव्हेंबर, २०२०

**वाचा:-** शासन परिपत्रक क्र. विपआ -२०१३/प्र.क्र.८/नापु-२८, दिनांक २६.०८.२०१३

**शासन शुद्धीपत्रक :-**

राज्यामध्ये लक्ष्य निर्धारित सार्वजनिक वितरण व्यवस्थेंतर्गत शिधापत्रिका वितरणातील अनियमितता व त्रूटीस जबाबदार असणाऱ्या तसेच गैरव्यवहार करणाऱ्या अधिकारी / कर्मचारी यांच्यावर कारवाई करणेबाबत दिनांक २६.०८.२०१३ च्या शासन परिपत्रकान्वये निर्देश देण्यात आले आहेत. सदर आदेशातील निलंबनासंदर्भातील तरतूद महाराष्ट्र नागरी सेवा ( शिस्त व अपिल ) नियम, १९७९ व विभागीय चौकशी नियमपुस्तिका,१९९१ मधील तरतुदींशी विसंगत असल्याने त्यामध्ये सुधारणा करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार सदर शासन परिपत्रकामधील परिच्छेद क्र. ६ मध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

| या ऐवजी | असे वाचावे |
|---|---|
| **त्याचबरोबर प्रकरणाचे गांभीर्य तपासून ज्या प्रकरणामध्ये शिस्तभंगविषयक कारवाईकरीता आढळून येणाऱ्या दोषाव्यतिरिक्त संबंधित अधिकारी/कर्मचारी यांची कृती फौजदारी गुन्हयाच्या स्वरूपाची असेल तर त्या प्रकरणी संबंधिताविरूध्द पोलीस ठाण्यात फौजदारी गुन्हा देखील दाखल करावा व संबंधितास निलंबित करावे.** | **त्याचबरोबर प्रकरणाचे गांभीर्य तपासून ज्या प्रकरणामध्ये शिस्तभंगविषयक कारवाईकरीता आढळून येणाऱ्या दोषाव्यतिरिक्त संबंधित अधिकारी/कर्मचारी यांची कृती फौजदारी गुन्हयाच्या स्वरूपाची असेल तर त्या प्रकरणी संबधिताविरूध्द पोलीस ठाण्यात फौजदारी गुन्हा देखील दाखल करावा व महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम, १९७९, विभागीय चौकशी नियमपुस्तिका,१९९१ मधील नियम तसेच यासंदर्भात शासनाने वेळोवेळी दिलेल्या आदेशानुसार सक्षम प्राधिकारी यांनी संबंधिताच्या निलंबनाबाबत उचित निर्णय घ्यावा.** |

३. सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२०११०९१५२६३१६९०६ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Mahesh Hanamant Kanade

Digitally signed by Mahesh Hanamant Kanade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=186feed352c84c3011bad227b61957313fa6946400e5e6e2732b859a161e1411, cn=Mahesh Hanamant Kanade
Date: 2020.11.09 15:30:47 +05'30'

**( महेश कानडे )**
**कार्यासन अधिकारी**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**प्रत,**

१) मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक,
२) सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
३) अप्पर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
४) सर्व विभागीय आयुक्त
५) नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई
६) सर्व जिल्हाधिकारी
७) सर्व उपायुक्त (पुरवठा)
८) सर्व उप नियंत्रक, शिधावाटप, मुंबई
९) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी/ अन्नधान्य वितरण अधिकारी
१०) अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागातील सर्व कार्यासने
११) निवड नस्ती (नापु-२८).